दिलीप भंडारे

# फॉर्मेश्वर चिंचाळकर गुरुजी



इंदूरचे ख्यातनाम चित्रकार विष्णू चिंचाळकर हे गुरुजी या नावानंच प्रसिद्ध होते. गुरुजी म्हणजे अवलिया माणूस. सर्वसामान्य माणसाला समजेल आणि करता येईल अशाच कलाकृती करण्याकडे त्यांचा कल होता. टूथपेस्टची रिकामी ट्यूब, बाटलीची झाकणे, झाडांच्या फांद्या, काड्याकुड्या, शेंगांची टरफलं, फळांच्या बिया, केरसुणी अशा असंख्य गोष्टींतून त्यांनी आपली चित्रं आणि शिल्पं तयार केली होती. अशा टाकाऊ आणि निरुपयोगी वस्तूंमध्ये गुरुजींना निरनिराळे फॉर्म आणि आकार सापडत असत.

गुरुजींना महाराष्ट्रातून फाय फाऊंडेशन पुरस्कार मिळाला आणि मध्य प्रदेश सरकारतर्फे सर्वोच्च कलाकारासाठी असलेला 'शिखर सन्मान'ही मिळाला. कुमार गंधर्व हे गुरुजींचे जवळचे स्नेही. याखेरीज पु. ल. देशपांडे, विजय तेंडुलकर, नारायण सुर्वे, दिलीप चित्रे, डॉ. श्रीराम लागू, बाबा आमटे, जॉर्ज फर्नांडिस, अर्थतज्ज्ञ राम देशमुख यांच्यासारखे मान्यवर गुरुजींच्या कलाकृतींचे चाहते होते.

गुरुजींचे अनेक वर्षांचे स्नेही दिलीप भंडारे यांनी रेखाटलेलं गुरुजींचं व्यक्तिचित्र-

मुंबईच्या जहांगीर आर्ट गॅलरीत १९७७ मध्ये एका बुजुर्ग कलाकाराचे प्रदर्शन भरलेले होते. या प्रदर्शनात नेहमीच्या पारंपरिक पद्धतीची चित्रे किंवा शिल्पे काही नव्हती; पण त्या कलाकाराच्या वेगळ्या व स्वतंत्र शैलीच्या चित्र-शिल्पांच्या कलाकृती मात्र यात होत्या.

जहांगीर आर्ट गॅलरीत नेहमीप्रमाणेच विविध प्रकारच्या कलारसिकांची वर्दळ मात्र चालू होती. हा बुजुर्ग कलाकार इंदूरचा होता आणि त्याला सर्व जण 'गुरुजी' म्हणत होते. माझी अन् गुरुजींची ओळख असल्याने मीही रोज या आर्ट गॅलरीत सकाळी दहा वाजल्यापासून त्यांच्या मदतीला व गप्पा मारायला येऊन बसायचो.

येणाऱ्या प्रेक्षकांमध्ये रोज-रोज आणि परत-परत येणारेही काही प्रेक्षक होते. त्यात एका माणसाने माझे लक्ष वेधून घेतले होते. निळी जीन पँट, त्यावर पांढरा स्वच्छ सदरा. त्याला पुढे दोन खिसे, अर्ध्या बाह्या आणि शर्ट आत पँटमध्ये खोचलेला असायचा तर कधी फिक्या रंगाचा टी-शर्ट असायचा. उंची साधारण साडेपाच फुटांपेक्षा जास्त, केस व्यवस्थित विंचरलेले व पायात सॉफ्ट शूज. अत्यंत साधे पण आकर्षक असे हे व्यक्तिमत्त्व दिसत होते. ओळीने दोन दिवस तो या प्रदर्शनाला भेट देत होता. तिसऱ्या दिवशी त्याच्याबरोबर व्हीलचेअरवर एक महिलाही आलेली होती. व्हीलचेअरवरच्या महिलेला तो प्रत्येक कलाकृतीपाशी घेऊन जात



*देवनागरी आणि इंग्रजी लिपींच्या अक्षरांमधून केलेली देखणी चित्रनिर्मिती*

होता. ती दोघेही तेव्हा निस्तब्ध असायचे. काही वेळा त्या दोघांचा संवाद व्हायचा अन् मग दोन-तीन मिनिटे ते तेथे थांबून ती कलाकृती नीट पाहून मग पुढच्या कलाकृतीकडे निघत होते.

गुरुजींनी त्यांच्या फाटक्या बनियनपासून बनवलेल्या 'येशू ख्रिस्ता'ची एक कलाकृतीही या प्रदर्शनात होती. ही दोघेही या कलाकृतीपाशी येऊन थांबली. दोन-तीन मिनिटे त्यांचे आपापसांत काही तरी बोलणे झाले आणि मग व्हीलचेअर पुढे सरकली.

जहांगीर आर्ट गॅलरीत आल्यावर डाव्या बाजूला हॉलमधले हे सारे प्रदर्शन त्यांनी शांतपणे हिंडून दोन-तीन वेळा पाहिले; पण प्रत्येक वेळी ते या 'येशू ख्रिस्ता'पाशी मात्र थांबत होते. त्याला न्याहाळत, काही तरी चर्चा करून मग ते पुढे आजूबाजूच्या कलाकृतींकडे जात असत; पण परत या येशूपाशी येऊन थांबत असत. एकंदरीत या येशूने त्यांना फार प्रभावित केले आहे, हे माझ्या लक्षात आले होते.

आर्ट गॅलरीच्या हॉलमध्ये मध्यावर प्रेक्षकांना विश्रांती घेण्यासाठी १५-२० खुर्च्या ठेवलेल्या होत्या. गुरुजींचे आम्ही काही मित्र तिथे बोलत बसलेलो होतो. रोज प्रदर्शनाला येणाऱ्या या व्यक्तीकडे माझे साहजिकच लक्ष होते. ही मंडळी येशूकडे बघून नंतर इकडेतिकडे शोधक नजरेनेही बघत होती. माझ्याशेजारीच गुरुजी बसलेले होते अन् काही तरी विषयावर बोलणे चालू होते.

गुरुजींना मी सुचवले, की ते कोण आहेत ते बघता का जरा! त्यांना बहुधा तुमच्याशी काही तरी बोलायचय, असे मला वाटते! गुरुजी लगेच त्या मंडळींजवळ गेले. त्यांची ओळख करून घेतली. हाच कलाकार येशू निर्माण करणारा आहे, हे या मंडळींना समजल्यावर त्यांना आनंद झाला.

लांबवर खुर्चीवर बसून मी त्यांचे हावभाव पाहत होतो. त्यांना झालेला आनंद आणि शांतपणे त्यांचा गुरुजींशी चाललेला संवाद मला दिसत होता. माझ्या शेजारी बसलेल्या मुंबईच्याच एका मित्राचे लक्ष मी तिकडे वेधले आणि त्याला विचारलं, की कोण असावीत बरं ही मंडळी? बहुधा ते येशूच्या अन् गुरुजींच्या प्रेमात पडलेले दिसतात.

माझा मित्र म्हणाला, "अरे व्वा! यांना तू ओळखत नाहीस? अरे हे तर अणुशक्ती आयोगाचे सध्याचे अध्यक्ष डॉ. होमी सेठना, आणि त्या त्यांच्याबरोबर व्हीलचेअरवर असलेल्या मॅडम म्हणजे 'निली सेठना.' मुंबईतील सामाजिक कामाची आवड असणाऱ्या व त्यात प्रत्यक्षात कृतिशील असणाऱ्या म्हणून सारी मुंबई त्यांना ओळखते. अत्यंत साधी राहणी अन् हसतमुख चेहऱ्याच्या या मॅडमना कोण ओळखत नाही?"

माझे लक्ष परत गुरुजी आणि सेठना मंडळींकडे वळले. मी माझ्या जागेवरून उठून या मंडळींच्या जवळ असलेल्या एका कलाकृतीजवळ जाऊन उभा राहिलो.

होमी सेठना गुरुजींना म्हणाले, "गुरुजी, बायबलमध्ये येशूने स्वतःचाच उल्लेख एका ठिकाणी 'रॅगचा तुकडा' (मी एक फाटक्या कापडी चिंधीचा तुकडा) म्हणून केला आहे. आजकाल आपल्याला सर्वत्र 'येशू' संगमरवरात पाहायला मिळतो; पण तुम्हीच त्याला खरे म्हणजे बरोबर जाणलेत आणि फाटक्या कपड्यातूनच त्याचे खरोखरचे दर्शन जे आम्हाला घडवलेत त्याला तोड नाही. आज जर 'येशू' असता, तर त्यानेही आपल्याला नक्कीच दाद दिली असती."

दोन-तीन क्षण मध्ये शांत गेले... आणि मग निली सेठना गुरुजींना म्हणाल्या, की गुरुजी, तुमच्यात व इतर चित्रकारांमध्ये हाच तर मोठा फरक आहे, की ते 'तगतात' आणि तुम्ही 'जगता.'

गुरुजींनी ही आठवण आपल्या मनात अगदी मोरपिसासारखी जपून ठेवली होती.

अशा या गुरुजींची अन् माझी ओळख पुण्यात पं. कुमार गंधर्वांच्या 'तुकाराम दर्शन' या कार्यक्रमाच्या वेळी १९७६ मध्ये झाली.

१९७६ च्या दिवाळीच्या सुटीमध्ये राष्ट्रीय एकात्मतेसाठी लहान मुलांचे सृजन उपक्रम असलेला एक बालमहोत्सव

इंदूरमध्ये घेण्याचे आंतरभारती संस्थेतर्फे निश्चित झाले होते.

महोत्सवाची कल्पना पालकांना, शाळेतील शिक्षकांना व विविध उपक्रमांच्या विषय मार्गदर्शकांना समजावून सांगणे, त्यांच्याशी चर्चा करणे, त्यांचे शंका निरसन करणे अशा प्रकारचे माझ्या कामाचे स्वरूप होते.

श्री. मुकुंद कुलकर्णी हे तेव्हा इंदूरमधील सामाजिक कार्य करणारे प्रसिद्ध व लोकप्रिय व्यक्तिमत्त्व होते. ते विचारसरणी व संस्कारांनी मूळचे संघ परिवारातले; पण नंतर मात्र ते कम्युनिस्ट पक्षाचे काम करत होते. 'अभ्यास मंडळ' ही संस्था तेव्हा ते चालवीत होते. काँग्रेससह सर्वच राजकीय पक्षांतील तरुण-तरुणी व मोठे त्यांच्याबरोबर काम करत असत. बालमहोत्सवाची कल्पना या लोकांना मी थोडक्यात समजावून सांगितल्यानंतर सर्वच जण उत्साहाने काम करायला तयार आहेत, हे माझ्या लगेचच लक्षात आले. इकडे चिंचाळकर गुरुजींना मी इंदूरमध्ये आल्याचा निरोप मुकुंद कुलकर्णींनि धाडलेला होता.

जमलेल्या स्वयंसेवकांपैकी एक जण मला सांगत होता, की गुरुजींना तुम्ही आल्याचा निरोप गेलेला आहे. ते त्यांची कामे उरकून थोड्याच वेळात इकडे येतीलच. आमचे इथले हे 'गुरुजी' म्हणजे फारच ग्रेट माणूस आहेत बरं का!

'ग्रेट आहेत? म्हणजे काय आहेत बुवा?' मी विचारले.

तो म्हणाला, ''त्याचं असं आहे, . इंदूरमध्ये एक मोठे कला महाविद्यालय आहे. हे गुरुजी तेथे फाईन आर्टचे प्राध्यापक म्हणून नोकरीला लागले. त्यांच्या कामाचा वेगळेपणा, त्यांना मिळणारी बक्षिसं आणि त्यांचा सर्वांशी मिळूनमिसळून वागण्याचा स्वभाव असल्यामुळे विद्यार्थ्यांमध्ये व प्राध्यापकांमध्ये ते लोकप्रिय झाले. पुढे काही वर्षांनंतर त्यांची लोकप्रियता ओळखून व त्यांचे पेंटिंगमधले कर्तृत्व पाहून त्याच संस्थेच्या प्राचार्यपदासाठी त्यांची नेमणूक झाली. हे नेमणुकीचे पत्र गुरुजींना मिळाल्यावर गुरुजींनी संस्थेकडे रजेचा अर्ज दिला अन् रजेवर गेले. काही दिवसांनी, त्यांची रजा संपायच्या आतच त्यांनी संस्थेकडे आपला राजीनामाही धाडून दिला.''

''का बरं? असं काय झालं, की गुरुजींनी एकदम राजीनामा धाडून द्यावा?'' न राहवून मी विचारलं.

''आम्हालादेखील असंच आश्चर्य वाटलं गुरुजींची ही बातमी ऐकली तेव्हा; पण मग नंतर एकदा गुरुजी भेटले तेव्हा मीच त्यांना त्याबद्दल विचारलं.'' माहिती सांगणारा बोलत होता.

गुरुजी म्हणाले, ''अरे यार, असं बघ, मी कला महाविद्यालयाची रजा घेतल्यानंतर त्या सुटीत विचार करू लागलो, की आता जर मी प्राचार्यपदाचा स्वीकार केला तर माझ्या आयुष्यात काय-काय होईल?''

''एक तर प्राचार्यपद स्वीकारल्यामुळे माझा पगार जरी वाढणार असला, तरी एकूणच कला महाविद्यालयाच्या व्यवस्थापनाची वाढती जबाबदारीही माझ्यावर येणार. बरं, माझा पगार आणि प्रतिष्ठा या प्राचार्यपदामुळे वाढली, की मग त्या प्रतिष्ठेप्रमाणे मला राहावेही लागणार. म्हणजे माझ्या राहणीमानाचा, जीवनमानाचा खर्चदेखील वाढणारच की. घरात विद्यार्थ्यांची, लोकांची ये-जाही सुरू होणार. घरातले कुटुंबाचे, मुलांचे खर्चही वाढणार. म्हणजे मग मला व माझ्या घरच्यांना या वाढत्या खर्चाची हळूहळू सवयच होणार. बरं पण मग हे वाढत्या खर्चाचे पैसे मी कोठून आणणार आहे? आणि मग अशा वेळी मला ज्यांची संगतदेखील नको असते अशा माणसांची पोर्ट्रेटची कामे पैशासाठी स्वीकारावी लागतील. ज्या लोकांना कलेमधलं काहीही कळत नाही आणि ज्यांना कलाकारांबद्दलही काही स्वारस्य नाही अशा लोकांशी माझा संबंध येत राहील आणि मग त्यांना आवडेल किंवा ते सांगतील त्या पद्धतीनेच मला त्यांचे काम करून द्यावे लागेल अन् त्यामुळे मला माझ्यातल्या कलाकाराचे आणि कलेचे स्वातंत्र्य मात्र त्यात गमवावे लागेल.''

*अगदी वेगवेगळ्या दोन भिन्न प्रवृत्तीच्या व प्रकृतीच्या वस्तू एकत्र आणूनदेखील त्यांनी आपल्या काही कलाकृती निर्माण केल्या आहेत. गुरुजींच्या घरातले फर्निचर म्हणजे गुरुजींच्या सृजनात्मकतेचा एक आदर्श आविष्कारच होता.*

''दुसरे असे पाहा, की महाविद्यालयीन व्यवस्थापनासाठी जी मानसिकता म्हणजे स्वभावातील कठोरता आणि शिस्त लागते, ती काही माझ्या नाही. तो माझा पिंडही नाही. मी आहे असा आपला सरळ-साधा कलाशिक्षक. बरं, या सगळ्या मनःस्तापाची सुरवात कोठून सुरू होते तर ती मी हे कला महाविद्यालयाचे प्राचार्यपद स्वीकारल्यापासून.

माझ्या रजेच्या काळात रोजच हे विचारचक्र माझ्या डोक्यात फिरत होते; पण मग एक दिवस मात्र माझ्या मनात विचार आला, की अरे बाबा, हा असा मनःस्ताप करणारे हे प्राचार्यपद आपल्याला हवेच कशाला बरं? आणि मग मात्र माझा त्यातून शेवटी राजीनाम्याचा निर्णय पक्का झाला व त्यामुळे माझे मन शांतही झालं. प्राचार्यपदाचा राजीनामा मी लगेचच लिहून महाविद्यालयात धाडून दिला.''

''अर्थात, माझा हा निर्णय घेण्याआगोदर मी राहुलजी बारपुते आणि कुमारजींसारख्या माझ्याजवळच्या इतर मित्रमंडळींबरोबरदेखील चर्चा केली होती. मनात असे घुसमटत बसण्यापेक्षा हा धाडसी निर्णय घ्यायला या मित्रमंडळींनी मला पाठिंबाही दिला. एकंदरीतच अशा परिस्थितीत राहण्यासाठी जे काही पैसे लागतील तर त्याची काही तरी व्यवस्था आपण करू, असं ते म्हणाले आणि त्याप्रमाणे मला या लोकांनी सहकार्यही केले.''

''जेव्हा का मी एकदाचा आमच्या संस्थेकडे राजीनामा धाडून दिला तेव्हा कुठे माझ्या मनावरचे दडपण कमी झाले.'' गुरुजी म्हणाले.

अभ्यास मंडळातला हा सहकारी मला गुरुजींच्या 'ग्रेट'पणाची माहिती देत होता.

मी इंदुरात आल्याचे चिंचाळकर गुरुजींना समजल्यावर ते लगेचच मुकुंद कुलकर्णींच्या घरी मला भेटायला आले. माझी एक-दीड

महिना राहण्याची सोय कुठे करायची, याची चर्चा मुकुंद कुलकर्णी त्यांच्या सहकारी मित्रांशी करत होते.

"अरे यार, याला दिलीपला इकडेतिकडे कशाला उतरवताय? तो आपला माझ्याच घरी राहील. म्हणजे आम्हाला खूप गप्पाही मारता येतील. कायरे दिलीप चालेल ना?'' गुरुजींनी मला विचारले.

"ते तुझं प्लॅनिंग-बिनिंग काय असेल ते तू आपलं करत जा. मी आणि आमची टीम व तू असे आपण सर्व जण मिळून पडेल ते काम करू. धमाल करू यार. मजा आयेगा.''

गुरुजी उत्साहानं बोलत होते. गुरुजींच्या या निमंत्रणामुळे मला आनंद तर झालाच; पण इंदूरच्या बालमहोत्सवाच्या यशाबद्दल खात्री आणि आत्मविश्वासदेखील आला. त्या वेळेस चिंचाळकर गुरुजी हे जेलरोडला स्नेहलता गंजमध्ये, भंडारी दवाखान्यामागे पंत वैद्य यांच्या घरात पहिल्या मजल्यावर राहत होते.

जिन्यातून चढून वर गेल्यावर डाव्या बाजूला त्यांच्या घराच्या हॉलचे प्रवेशद्वार होते. हॉल ऐसपैस मोठा म्हणजे साधारण २५ फूट बाय १५ फूट असा होता. हॉलमध्ये गुरुजींच्या काही कलाकृती मांडून ठेवलेल्या होत्या.

त्यांच्या या बाहेरच्या हॉलला आडवा चिकटूनच एक दुसरा तेवढाच हॉल होता. बाहेरच्या हॉलच्या मानाने तो कमी उजेडाचा होता. या हॉलमध्ये गुरुजींची जुनी ऑईल पेंटिंग्ज, इझल, डॉंकी, पेंटिंग लावायच्या फ्रेम्स आणि नाट्यभारती संस्थेचे काही सामान, नाटकाच्या विंगांच्या फ्रेम्स, पडदे असे सामान ठेवलेले होते. बाहेरील दिवाणखान्याच्या हॉलला जोडून एक लहानशी गच्चीही होती. गुरुजींना स्वतःहून सगळी कामे करायचा हव्यास असल्याने व कोणत्याही कामात शक्यतो आपल्याला परावलंबी राहावे लागू नये म्हणून गुरुजींनी घरीच छोटेसे एक वर्कशॉप तयार केलेले होते. त्यांच्या त्या छोट्याशा गच्चीत पायांनी चालवायचे प्लायवूड निरनिराळ्या आकारात कापायचे फ्रेटवर्कचे मशिन होते. काम करताना वस्तू पकडून ठेवण्यासाठी वेगवेगळ्या प्रकारचे लोखंडी व्हॉईस होते. निरनिराळ्या आकाराच्या व पोताच्या (टेक्श्चरच्या) घासकामासाठी फाईल्स (कानस) होत्या, ड्रील मशिन होते, पोगर, छिन्नी, हातोडा, स्क्रूड्रायव्हर, स्पॅनर्स अशी कित्येक प्रकारची हत्यारे त्यांनी जमवली होती आणि अत्यंत सहजपणे ही हत्यारे ते हाताळत होते.

सर्वसामान्य माणसाला समजेल आणि त्याला सहज साध्या पद्धतीने काही कलानिर्मिती करता यावी यासाठी गुरुजी नेहमीच प्रयत्नशील होते. टाकाऊ आणि निरुपयोगी वस्तूंचा उपयोग करूनसुद्धा चित्र किंवा शिल्पनिर्मिती करता येते, हे ते आपल्या कामातून दाखवून देत असत.

## गुरुजींची वैशिष्ट्ये

सर्वसामान्य माणसाला अनावश्यक वाटणाऱ्या टाकाऊ वस्तू आणि निरर्थक



*स्लीपर आणि टूथपेस्टची ट्यूब यांतून साकारलेली 'मोनालिसा'*

वाटणाऱ्या गोष्टी हेच साहित्य कलानिर्मितीसाठी गुरुजी वापरत असत. टूथपेस्टची रिकामी ट्यूब, सोडावॉटर बाटलीची झाकणे (बिल्ले), आईस्क्रीमचे लाकडी चमचे, पॉलिथिनच्या प्लॅस्टिक पिशव्या, झाडांच्या फांद्या, काड्या-कुड्या, आंब्याच्या कोयी, शेंगांची टरफलं, झाडांचे कापलेले बुंधे, झाडांच्या साली, फळांच्या बिया, पापुद्रे निघालेले प्लायवूडचे तुकडे, खराब झालेल्या तारांची जाळी, गुंडाळण्याचा दोरा, कापडाची नवार, सिगारेट पाकिटातील चांदी, मोकळ्या काड्यापेट्या, गेलेले विजेचे दिवे (बल्ब), चष्म्याचे घर, धुणं वाळत घालण्याचे चिमटे, तुटलेल्या हवाई चपला, कुल्फीचा कोन, केरसुणी, मोडके फर्निचर यांसारख्या कित्येक वस्तूंमधून त्यांनी त्यांची कलानिर्मिती केली होती.

अगदी वेगवेगळ्या दोन भिन्न प्रवृत्तीच्या व प्रकृतीच्या वस्तू एकत्र आणूनदेखील त्यांनी आपल्या काही कलाकृती निर्माण केल्या आहेत. गुरुजींच्या घरातले फर्निचर म्हणजे गुरुजींच्या सृजनात्मकतेचा एक आदर्श आविष्कारच होता. 'नई दुनिया' या हिंदी दैनिकासाठी गुरुजी काम करत होते. वर्तमानपत्राचा न्यूजप्रिंट कागद ज्या पुठ्ठयांच्या रिळांवर गुंडाळला जातो, ती कागद संपलेली गोल सिलिंडर आकाराची निकामी रिळे गुरुजींनी घरी आणलेली होती. त्यांचे दोन-दोनचे किंवा तीन-तीन, चार-चारचे युनिट तारांनी एकत्र बांधून बनवले होते. या युनिटच्या जोडीच्या आधारावर त्यावर फळी ठेवून गुरुजींनी दिवाण बनवलेला होता. तर कधी ड्रॉइंग बोर्ड त्यावर ठेवून टीपॉय केलेले होते. अशाच प्रकारे घरातील सोफा, शेल्फ आणि इतर फर्निचर बनवलेले होते. झाडाच्या बुंध्याचे खोड वखारीतून आणून त्याचा उपयोग या हॉलमध्ये स्टुलासारखा होत होता. या फर्निचरच्या फळ्यांवर साध्या सतरंज्यांच्या, गोधडीच्या आणि चादरीच्या घड्या अंथरून त्यावर मऊ गादी केलेली असायची.

रात्री झोपताना लावायच्या मच्छरदाण्या गुंडाळून ठेवायची गुरुजींची अशी खास एक पद्धत होती. काठीला बांधलेल्या मच्छरदाण्या गुंडाळून ठेवून ते त्या कोपऱ्यात उभ्या करून ठेवत असत. पण गंमत अशी, की लांबून कोणी त्याकडे पाहिल्यास ते एखादे शिल्प (स्कल्प्चर) असल्यासारखे दिसत असे. एखाद्या दिवशी त्याकडे पाहताना डोक्यावर चादर घेतलेला गरीब भिकारी दिसत असे. तर दुसऱ्याच दिवशी त्या भिकाऱ्याच्या जागेवर बांधकामावर असलेली मजूर बाई तयार होत असे. हे सर्व करताना गुरुजींचा फार हट्ट तर मुळीच नसायचा; पण सहज गप्पा मारता मारता त्यांचे हातांनी काम मात्र चाललेले असायचे.



*नवारीच्या तुकड्यांपासून बनलेली डोक्यावर पदर घेतलेली स्थूल बाई*

पिठाच्या गिरणीत इलेक्ट्रिक मोटरपासून दळणाऱ्या मशिनच्या चाकापर्यंत एक पट्टा लावलेला असतो. त्याला 'नवार' म्हणतात. अशाच प्रकारच्या पातळ पट्ट्याची कापडी नवार खांद्यावरच्या शबनम पिशवीलाही लावलेली आढळते. अशा प्रकारचे निरनिराळ्या लांबीचे, रूंदीचे आणि वेगवेगळ्या रंगांच्या नवारीचे तुकडे गुरुजींच्या घरी होते. या नवारीला गुरुजींनी फावल्या वेळात गुंडाळून कोपऱ्यात अशा पद्धतीने भिंतीला टेकवून उभे केले होते, की लांबून पाहणाऱ्याला डोक्यावर पदर घेतलेली ती एक स्थूल बाई उभी असल्याचा भास होईल.

गुरुजींच्या घरातील हॉलमधील भिंतींना वरून छप्पराच्या बाजूने ओल आलेली होती. या ओलीमुळे भिंतींवरील रंगांचे पापुद्रे पण वेड्यावाकड्या आकारांमध्ये पडलेले होते. त्यामुळे आतील पहिल्या रंगाचा थरही काही ठिकाणी प्रगट होत होता. गुरुजींनी ओल आणि पापुद्र्यांवरच कधी उभी, तर कोठे आडवी लाकडी फ्रेम लावली, की त्यामध्ये सर्वसामान्य माणसाला लगेच लँडस्केप दिसायला लागायचे.

गुरुजींच्या घरामधल्या या हॉलच्या जमिनीला ना टाईल्स होत्या ना फरशा. साधी लाल कोब्याची जमीन केलेली होती. जमिनीच्या प्लास्टरला बऱ्याच ठिकाणी भेगा तर पडलेल्या होत्याच; पण काही ठिकाणांवर चक्क जमिनीच्या खपल्या निघून खाचखळगे आणि खड्डे पडलेले होते.

"अरे यार, याचीही एक गंमत आहे बरं का !" गुरुजी म्हणाले. "बघ आता" गुरुजींनी एका रबरी रोलरला ऑईल पेंट लावला व त्या भेगांवरून तो रोल फिरवला. रोलरवरील रंग इतस्ततः, वेडावाकडा जमिनीच्या भेगांवर व खड्ड्यांवर पसरला. त्यावर एक स्वच्छ पांढरा कागद गुरुजींनी अंथरला व या पांढऱ्या कागदावर दोन-तीन वर्तमानपत्रे गुरुजींनी दाब देण्यासाठी अंथरली व त्यावरून स्वच्छ रबरी सिलेंडरचा रोलर फिरवला आणि ते संपल्यावर जमिनीवर अंथरलेला पांढरा मोठा कागद अलगदपणे जमिनीपासून सोडवून घेतला. जमिनीवर पसरलेल्या रंगाने पांढऱ्या कागदावर आता

विविध आकार घेतलेले होते. हा कागद वाळल्यानंतर गुरुजींनी त्याला एक फ्रेम लावून दाखविली. त्या विविध रंगी आकारातून गुरुजींचे एक लँडस्केप तयार झालेले होते. त्यात लहान-मोठे डोंगर होते, आकाशाचे भरकटलेले रंग होते, ढग होते, झाडं होती, झुडपे होती, मेंढ्यांचा कळपसुद्धा होता. गुरुजींच्या घरात अशा वेगवेगळ्या कलाकृती तयार करून ठेवलेल्या होत्या.

उदा. १) चपड्याचे घर (डबी) आणि कागदाला लावायचा चिमटा या दोघांना एकत्र आणून त्यांनी नंदीबैल साकार केलेला आढळतो.





२) जुन्या झालेल्या तारेच्या जाळीपासून माणसाच्या चेहऱ्याचे शिल्प त्यांनी तयार केले आहे.

३) कपडे अडकविण्यासाठी असलेला पण मोडलेला हँगर, कागद कापण्याची सुरी, प्लॅस्टिक कुलपाची किल्ली, चित्रकारीचा ब्रश या साहित्यामधून गुरुजींनी महात्मा गांधींचे चित्र साकार केले होते.



४) हवाई चपलेच्या (स्लीपर) खराब बंदांना काढून टाकून त्या मोकळ्या भोकात रिकाम्या टूथपेस्ट ट्यूबचा उपयोग करून गुरुजींनी आपली स्वतःची वेगळीच 'मोनालिसा' साकार केली होती. गुरुजींच्या या कलाकृतीतून आजूबाजूच्या स्थानिक शेजाऱ्यांनी प्रेरणा घ्यायच्याऐवजी गुरुजींच्या घरी तुटक्या चपला लोक आणून टाकू लागले आणि वर गुरुजींना ते सांगत असत, "अरे यार गुरुजी, इसका कुछ बनाओ यार. हमको कुछ नही जमता और ना हमारे पास इतना समय भी है। ये सब तुम्हारे ही कामकी चिजे है।"

गुरुजींचे स्नेहलतागंजमधील घर म्हणजे त्यांच्या कलाकृतींचे एक प्रदर्शनच झाले होते. त्यामुळे बाहेरगावांहून इंदूरला येणाऱ्या कलाप्रेमींना गुरुजींच्या घरी चक्कर मारून गुरुजींनी काय काय नवीन गोष्टी केलेल्या आहेत, हे पाहण्याची उत्सुकता असायची.

या रसिकांमध्ये खूप प्रकारची विविधता असायची. बडोद्याचे आर्किटेक्ट व मराठी साहित्यातील लेखक (कै.) माधव आचवल हे तर गुरुजींचे मित्रच; पण मराठी स्टेज व हिंदी सिनेमातील मान्यवर अभिनेते डॉ. श्रीराम लागू आणि भारताचे माजी संरक्षणमंत्री. जॉर्ज फर्नांडिस हेदेखील गुरुजींचे काम पाहून प्रभावित झाले होते. टाटा इन्स्टिट्यूट ऑफ फंडामेंटल रिसर्च, मुंबई या संस्थेमध्ये पूर्वी काम करणारे शास्त्रज्ञ व सध्या दिल्लीच्या 'भारत जनग्यान विज्ञान जथ्था' या संस्थेचे सचिव अनिल सद्गोपाल, दिल्लीच्या एनसीइआरटी संस्थेसाठी सोप्या साध्या वैज्ञानिक प्रयोगांवर आधारित मुलांसाठी पुस्तके तयार करणारे अरविंद गुप्ता, अहमदाबादच्या नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ डिझाईन संस्थेतील प्रा. सुदर्शन खन्ना, हिंदी भाषेतील प्रसिद्ध कवी आणि सध्या नागपूर येथील राष्ट्रीय हिंदी विद्यापीठाचे कुलगुरू अशोक वाजपेयी ही सर्व मंडळी इंदुरात आल्यावर गुरुजींच्या घरी हजेरी लावत असत.

## फ्रायडे ग्रुप

मल्हार आश्रम बालमहोत्सवाच्या वेळी गुरुजींकडे एक मोपेड होती. त्या मोपेडवर मला बसवून गुरुजी बाल आनंद महोत्सवाच्या मैदानावर घेऊन जात असत. इथं होणाऱ्या मीटिंगना गुरुजींचे शिष्य व मित्रही जमत असत. गुरुजींच्या मोपेडवर मी मागच्या बाजूला पाय आखडून बसलेला असायचो. इंदूरच्या मोठ्या रस्त्याने वा गल्ली-बोळातून गुरुजी सहजपणे मोपेड चालवीत असत. इंदूरमध्ये रस्त्यावर वाहतूक शिस्त अस्तित्वात आहे की नाही, याची शंका यावी अशी तेव्हाची परिस्थिती होती. आपल्या वाहनामागून येणारी वाहने खुशाल डाव्या बाजूने ओव्हरटेक करीत होती. समोरून येणारे सायकलस्वार, स्कूटरवाले त्यांच्या डाव्या बाजूने वाहने चालविण्यापेक्षा बरेच जण त्यांच्या उजव्या बाजूनेच वाहने चालवत गुरुजींच्या गाडीसमोर येत असत. हे सर्व पाहून मी थक्कच झालेलो होतो. आपल्या मुंबई-पुण्याच्या रहदारीपेक्षाही हा वेगळाच अनुभव मला तेव्हा होता. न राहून मी गुरुजींना विचारले, की काय हो गुरुजी, या पद्धतीने जर नेहमीच तुमच्याकडे वाहतूक नियम न पाळता लोक वाहन चालवत असतील तर मग वाहन चालवणारे गोंधळत असतील? अपघातही होत असतील?

"तू म्हणतोस तसं काऽही होत नाही !" गुरुजी म्हणाले.

"अहो, कसं शक्य आहे?" मी विचारलं.

"त्याचं असं आहे यार, नदीच्या पाण्यामध्ये किती तरी लहान-मोठे मासे एकाच वेळी उलटसुलट दिशेने आणि वेगाने फिरत असतात ते तू पाहिलेस ना? मग? त्यांची कधी टक्कर होते का? नाही ना? मग? इथे इंदूरमध्येही तसेच आहे. सगळे एकमेकांना समजून-उमजून आपापले वाहन चालवत असतात," गुरुजी म्हणाले.

मोपेडवरच्या आमच्या प्रवासात गुरुजी मला काय काय ती नवीन नवीन माहिती देत असत. "बरं का रे दिलीप, या जेल रोडला आम्ही राहायला येण्याच्या अगोदर नंदलालपुरा म्हणून इंदूरचा एक भाग आहे तिथे आम्ही राहत होतो. या जागेतदेखील मोठा मजा असायचा यार. तिथं आमच्या आर्टिस्ट मित्रमंडळींचा एक ग्रुप जमला गेला. चंदू नाफडे, वसंत चिंचवडकर, पांडू पारनेरकर, वणकर वगैरे निरनिराळ्या पद्धतीच्या शैलींमध्ये आपापल्या चित्रकलेचं काम करणारी ही मंडळी होती. पेंटिंगच्या चित्रांच्या विषयांवर, कांपोजिशनवर, रंगसंगतीवर आमच्या चर्चा व्हायच्या. प्रत्येकाचे टेंपरामेंट व काम करण्याची पद्धती ही जरी वेगळी असली, तरी सर्वांचा एकोपा मात्र होता. ही मंडळी योगायोगाने दर शुक्रवारी माझ्याकडे जमू लागली आणि यातूनच या ग्रुपलाच आम्ही 'फ्रायडे ग्रुप' असे नाव दिले. या ग्रुपच्या कलावंतांना पुढे राष्ट्रीय पातळीवर झालेल्या प्रदर्शनात

चांगलीच मान्यताही मिळाली. बरं का!''

''याच काळात मी 'नई दुनिया' या इंदूरमधल्या दैनिकासाठी चित्र काढून द्यायचे काम करायचो. आतासारखे हे वर्तमानपत्र तेव्हा मोठे झालेले नव्हते. तेव्हा त्यांच्याकडे लहान-लहान मशिन होती. अक्षरजुळणी तेव्हा हातानेच करावी लागायची. चित्रांसाठी सध्या जस्ताचे ब्लॉक करतात; पण हे तंत्रज्ञान तेव्हा इंदुरात फारसे प्रगत झालेले नव्हते.''

''त्या वेळी लाभचंद छजलानी हे या दैनिकाचे मालक होते. फारच उमदा आणि मोठ्या मनाचा हा माणूस होता आणि आपले राहुलजी बारपुते हे तेव्हाही 'नई दुनिया'चे संपादकच होते. या दोघांचाही माझ्या कामावर विश्वास होता आणि त्यामुळे मी चित्रांसाठी जे काही प्रयोग करीत असे, त्याला त्यांची मान्यता असायची आणि या लोकांमुळेच तर मला चित्रकलेत नवनवीन प्रयोग करता आले. चित्र करण्यासाठी मी तेव्हा लिनोनियमच्या मॅटिंग्जचे तुकडे वापरायचो. त्यावर चित्र काढायचो. आणि मोची (चांभार) वापरतो तशा प्रकारच्या कटरने छोटासा तिरका छेद घेऊन ते चित्र कोरून घ्यायचो. मग त्याला जाड लाकडी फळीवर खिळ्यांनी ठोकून पुढे छापायला द्यायचो. या प्रकाराला त्या वेळेस आम्ही 'लाईनोकट ड्रॉईंग' म्हणत असू. काही वेळा मी प्लायवूडचे पापुद्रे काढून त्यांनाच सरळ खिळे ठोकून चित्र बनवायचो किंवा काही वेळा प्लायवूडवर धारदार, अणकुचीदार टोकाच्या दाभणाने किंवा बर्फ फोडायच्या टोचाने कोरून कोरून चित्र बनवायचो. याला त्या काळात आम्ही 'वूडकट ड्रॉईंग' म्हणायचो.''

## नेपथ्यातले प्रयोग

आमच्या घरी हळूहळू निरनिराळ्या कलाकार मित्रांची वर्दळ सुरू झाली होती आणि गंमत म्हणजे याच काळात आमच्या बाबा डिकेंच्या 'नाट्यभारती' या संस्थेचे कामही नेटाने सुरू झाले होते. मग काय विचारता? त्यानिमित्ताने राहुलजी बारपुते व नाट्यभारतीच्या इतर कलावंतांचीही उठबस माझ्याकडे वाढली. नाट्यभारतीच्या नाटकांचे नेपथ्याचे काम माझ्याकडेच असायचे. कमीत कमी खर्चात व साध्या स्वस्त सामानात मी माझे नेपथ्य तयार करीत असे. माझ्या मदतीला मग माझी मित्रमंडळीही असायची. नाट्यभारतीची नाटके घेऊन तेव्हा आम्ही गावोगाव फिरत असू आणि मीही त्या निमित्ताने त्यांच्या टीमबरोबर फिरत असे, गुरुजी सांगत होते.

''एकदा दिल्लीच्या नाट्यप्रयोगाला फार गंमत झाली यार !''

*गुरुजींच्या घरातील हॉलमधील भिंतींना वरून छप्पराच्या बाजूने ओल आलेली होती. या ओलीमुळे भिंतींवरील रंगांचे पापुद्रे पण वेड्यावाकड्या आकारांमध्ये पडलेले होते. त्यामुळे आतील पहिल्या रंगाचा थरही काही ठिकाणी प्रगट होत होता. गुरुजींनी ओल आणि पापुद्र्यांवरच कधी उभी, तर कोठे आडवी लाकडी फ्रेम लावली, की त्यामध्ये सर्वसामान्य माणसाला लगेच लँडस्केप दिसायला लागायचं.*

''दिल्लीच्या लालकटोरा गार्डनच्या भव्य रंगमंचावर नाट्यभारतीचे 'रेश्मी गाठें' हे नाटक होते.'' कोलकत्याचे किंवा चेन्नईचे लोक त्यांच्या नाटकाचा ग्रुप घेऊन आलेले होते. त्यांचे सेटिंगचे सर्व सामान भरून ट्रक आलेला होता. त्यांच्या नेपथ्यकाराने मला विचारले, ''अरे भाई, आपका नेपथ्य का ट्रक कहाँ है?''

मी त्याला म्हणालो, ''अरे यार, हमारे नेपथ्य का सामान हमने ट्रक मे नही बल्की 'ट्रंक' मे लाया है.''

या उत्तराने तर तो बिचारा चक्रावूनच गेला. दिल्लीचा तो नाट्यप्रयोग पाहणारे सांगतात, की गुरुजींनी नाटकातील जुहू बीचचा बंगला तेव्हा अशा काही ताकदीने उभा केला होता, की भारत सरकारचे तेव्हाचे नाट्य विभागाचे प्रमुख कर्नल गुप्ते यांनी आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी टाळ्यांचा कडकडाट करून त्याला प्रचंड दाद दिली. प्रेक्षकांमध्ये तेव्हाचे केंद्रीय मंत्री डॉ. केसकरही होते. त्या सेटबद्दल गुरुजींचे मित्र पु. ल. तर म्हणाले, ''गुरुजींनी तर या निमित्ताने रंगमंचावरच्या नेपथ्यशैलीला एक नवीन दृष्टीच दिलेली आहे.''

१९७६ च्या इंदूर बालमहोत्सवाच्या निमित्ताने महिना-दीड महिना मी गुरुजींच्या घरीच राहत होतो. बालमहोत्सवात मुलांच्या दृष्टीने रंगीत आणि चित्रमय वातावरणनिर्मिती करावयाची होती. निरनिराळ्या प्राण्यांच्या साध्या व सोप्या आकारांतली चित्रे निवडून प्लायवूडवर त्याचे कटआऊट करायचे ठरले होते. चित्रांची भरपूर पुस्तके अतुल लागू यांच्या 'प्रगती' पुस्तकालय या दुकानात होती. त्यांनी ती पाहून, घेऊन जायला सांगितले होते. एक दिवस सकाळी पुस्तके दाखविण्याच्या निमित्ताने गुरुजींनी मला त्यांच्या मोपेडवरून जेल रोडवरच्या 'प्रगती' पुस्तकालयात नेले; पण पुस्तकाचे दुकान अजून उघडलेलेच नव्हते.

''चल यार, तुला अजून एक ठिकाण दाखवून ठेवतो. बालमहोत्सवासाठी किंवा तुला स्वतःलाही जे काही कलासाहित्य लागेल ते तू या ठिकाणाहून घेत चल,'' गुरुजी म्हणाले.

गुरुजींच्या मोपेडवरून मग परत आमचा प्रवास सुरू झाला. जेल रोडवरच 'मेंडवेल' नावाच्या दुकानासमोर गुरुजींनी गाडी थांबवली. मेंडवेलच्या मालकांची आणि माझी ओळख त्यांनी करून दिली अन त्यांना सांगितलं, ''हा आमच्या पुण्याचा चित्रकार मित्र आहे. इंदुरात जो बालमहोत्सव होणार आहे त्यासाठी हा माझ्याकडे आलेला आहे. हा कधीही दुकानात आला तर त्याला जे साहित्य पाहिजे असेल ते देत चला आणि माझ्या नावावर मांडून ठेवा.''

दुकान मालकाने माझ्याकडे पाहून हसतमुखाने गुरुजींना होकार तर दिलाच पण वर ते म्हणाले, ''गुरुजी, अहो खूप दिवसांनी तुम्ही आज आमच्या दुकानात आला आहात. आता तुम्ही आणि तुमचे पाहुणे चहा घेऊनच जा,'' असे म्हणून त्यांनी चहा मागवला.

चहा पिऊन आम्ही मोपेडवरून घरी यायला निघालो. ''बरं का रे यार, तुला लागणारे काहीही सामान बेलाशक तू या दुकानातून घेत चल. तो माझ्या नावावर

मांडून ठेवेल,'' गुरुजी मला म्हणाले.

''अहो गुरुजी असं कसं चालेल मला? मी आपले काय ते रोख पैसे देत जाईन,'' मी म्हणालो.

''तो तुझ्याकडून पैसे घेणारच नाही.''

''त्यांचं काय आहे यार, इतके वर्षे मी माझे सर्व कला साहित्य यांच्याच दुकानातून घेत आलेलो आहे. आजतागायत यांनी कधीही पैशाबाबत माझ्याकडे विचारणा केली नाही की कधी लकडाही लावला नाही. मला सवड होईल तेव्हा मीच मध्ये कधी तरी एकदम सगळे पैसे त्याला देऊन येतो,'' गुरुजी म्हणाले.

गुरुजींचा सरळसोट स्वभाव व मृदुभाषा या त्यांच्या गुणवत्तेमुळे ते जनसामान्यात प्रिय होते. त्या मेंडवेल दुकानाचा मालक तर नंतर एकदा मला म्हणाला, ''अहो, तुमच्या गुरुजींसारखा माणूस आमच्या इंदुरात राहतो हा आम्हा इंदूरकरांचा सन्मानच आहे आणि असा माणूस विश्वासाने आमच्याकडून माल घेतो ही आमच्या दुकानची प्रतिष्ठा आहे.''

गुरुजींनी मात्र अशा लोकांचा कधीही गैरफायदा घेतला नाही.

गुरुजींच्या घरी येणाऱ्या -जाणाऱ्या माणसांची वर्दळ बरीच असायची. गुरुजींची पेंटिंग्ज किंवा इतर कलाकृती बघण्यात लोकांना आपल्या वेळेचे भान राहत नसे. गुरुजीदेखील येणाऱ्या प्रत्येकाला तितक्याच तन्मयतेने माहिती देत असत.

गुरुजींच्या घरी तेव्हा त्यांचे कुटुंबीय म्हणजे माई (गुरुजींची बायको), दिलीप (मुलगा), ताराबाई (मुलगी) व ताराबाईंच्या २ लहान मुली पियुषा व मनीषा या घरात असत. घरात लहान मुले असल्याने हसणे खिदळणे आणि खोड्या काढणेही भरपूर चालायचे. त्या दोन्ही लहान नातीदेखील निरनिराळ्या वस्तूंमध्ये त्यांना दिसेल ते चित्र



*गुरुजी, 'नई दुनिया'चे संपादक राहुल बारपुते आणि कुमार गंधर्व*

आकार गुरुजींकडे येऊन त्यांना दाखवत असत आणि गुरुजीदेखील त्यांना 'बढिया' म्हणून शाबासकी देऊन प्रोत्साहन देत असत.

## कुटुंबातले गुरुजी

गुरुजींकडे काम बघायला येणाऱ्या लोकांना काही काळ, वेळाचं भान नसायचं आणि मग गुरुजी मध्येच स्वयंपाकघरात जाऊन माईंना पोहे, चहा करायला सांगत असत. रोजची घरातील कामे बाजूला सारून स्वयंपाक अर्धवट सोडून माई ही कामे करत होत्या. सर्वांना खाऊ-पिऊ घालत होत्या. मला आठवतंय माईंच्या हातचा फोडणीचा भात किंवा फोडणी दिलेला पोळीचा कुसकरा म्हणजे तर त्यांची स्पेशॅलिटीच होती.

***कुमारजींनी जसे संगीतातल्या सारेगम या मूलभूत स्वरांमधूनच रागांची नव्या पद्धतीने मांडणी करून नवीन शैलीचे संगीत तयार केले तसेच गुरुजींनी अ, आ, ई या मूलभूत देवनागरी लिपीच्या अक्षरांमधून चित्रनिर्मिती करून दाखवली. दोघेही एकमेकांचे गुण हेरून आपापल्या कला माध्यमातून आपापला कला आविष्कार देत राहिले. हे दोघेही एकमेकांना आपल्या कलेची प्रेरणा मानायचे.***

गुरुजींचे किंवा त्यांच्या दिलीपचे घराबाहेर हिंडणे फिरणे भरपूर होते, पण घरात सतत होणाऱ्या माणसांच्या वर्दळीमुळे व त्यांच्या खाण्या -पिण्याकडे माईंनाच लक्ष द्यावे लागत असल्यामुळे माई घरातच जास्त असत. त्यांचा बाहेरच्या जगात वावर एकूणच कमी होता. गुरुजींच्या मनात मात्र ही बोचणी होती. ते म्हणायचे, ''बाहेर यार, आमची आपली सगळी गंमतजंमत चालते. निरनिराळा प्रदेश पाहणं होतं पण माई मात्र बिचारी घरातच एकटीच अडकून राहते.'' मनाच्या होणाऱ्या या घुसमटीला मग गुरुजींनी एक मार्ग शोधून काढला. फक्त माईंनाच बरोबर घेऊन त्यांनी दक्षिण भारत दर्शनाची एक ट्रीप आयोजित केली. दक्षिण भारतातून उत्तरेत येताना त्या दोघांचा पुण्यात २ दिवसांचा मुक्कामही झाला होता. माई पण या ट्रीपमध्ये मोठ्या खुषीत व मनमोकळ्या झालेल्या दिसल्या. फक्त गुरुजींबरोबर एवढा मोठा प्रवास त्यांनी पहिल्यांदाच केलेला होता.

गुरुजींचा मुलगा दिलीप हा इंदूरमधले त्याचे कॉलेजचे शिक्षण पूर्ण करून पुढे दिल्लीला गेला. दिल्लीत त्याने एम.एस्सी. ॲग्रिकल्चरमध्ये करून स्कॉलरशिप मिळवली अन पीएच.डी.साठी तो ऑस्ट्रेलियाला गेला.

ऑस्ट्रेलियात गेल्यावर तिथल्या कॉलेज शिक्षणात त्याने थोडे फार दिवस घालवले; पण त्याचे मन काही त्या कॉलेजात रमेना.

कॉलेजात जी मित्रमंडळी त्याने जोडली होती त्यातील ४-५ जण एकत्र एका घरात राहत होते. दिलीप त्यांच्याबरोबर मग राहू लागला. त्या मित्रांपैकी प्रत्येकाचे आवडीचे विषय वेगवेगळे होते. कुणी सतत टीव्हीसमोर बसून असायचा, तर कुणी वाचनात दंग, कुणी किचनमध्ये वेगवेगळे पदार्थ करण्यात प्रवीण, तर कुण इकडे तिकडे भटकण्यात आपले जीवन सार्थक मानत होता. दिलीप या मित्रांबरोबर चांगलाच रमला. या मित्रांच्या गुणांची पारख त्याला होत होती आणि म्हणूनच त्यांच्या गुणदोषासकट त्याने त्यांना स्वीकारले होते. होईल तेवढा ऑस्ट्रेलिया कधी पायी तर कधी हिचकायकिंग करत दिलीपने पाहून घेतला. तिथे जमलेल्या भारतीयांचे, परदेशी व स्थानिक ऑस्ट्रेलियन मित्रांचे बरे- वाईट अनुभव पण अनुभवले.

ऑस्ट्रेलियात त्याला येत असलेल्या अनुभवांचे वर्णन तो पत्ररूपाने इंदूरला घरी कळवत होता. इकडे इंदूरला संपादक राहुल बारपुते यांनी 'नई दुनिया'मध्ये त्याचे हे पत्ररूपातले अनुभव छापायला घेऊन त्याची एक लेखमालाच तयार केली. दिलीपचे 'नई दुनिया'मधले ते लेख तेव्हा फार गाजले.

तिकडे ऑस्ट्रेलियात कॉलेजखेरीज इतरच ॲक्टिव्हिटीजमध्ये दिलीप जास्त रमत असल्याने कॉलेजने त्याच्या शिक्षणासंबंधी त्याला विचारणा केली. स्कॉलरशिप बंद होण्याची भीती पण निर्माण झाली; पण मग दिलीपने त्याच कॉलेजमध्ये प्रिंटींग संदर्भातील एक शिक्षणक्रम निवडून आपले शिक्षण बंद पडू दिले नाही.

ऑस्ट्रेलियातून दिलीप भारतात परतला. एखादा बाप त्याच्या मुलावर 'काय रे शिक्षण सोडून तिकडे काय भलतेच उद्योग करत बसला होतास रे,' असे म्हणून त्याच्यावर वसकन ओरडलाही असता; पण गुरुजी असला बाप नव्हते.

दिलीपने ऑस्ट्रेलियात जे काही पाहिलं, जे काही मिळवलं त्यावर ते भलतेच खूष होते. 'तू एकटा स्वतःच्या पायावर उभा राहायला शिकलास. माणसांचे, मित्रांचे बरेवाईट अनुभव मिळवलेस. अत्यंत कमी खर्चात काटकसरीने राहून, कष्टाने व पायी फिरून ऑस्ट्रेलिया पाहिलास, मी खूष आहे. अरे यार, खरे शिक्षण म्हणजे हेच तर आहे. बाकी कॉलेजात किंवा विद्यापीठात जाऊन काय कुणीही शिकतं." गुरुजींच्या या उद्गाराने दिलीपला दिलासा मिळाला.

## कुमारजींची स्केचेस

बालमहोत्सवानंतर अधूनमधून माझे इंदूरला जाणे येणे सुरू झाले. असाच एकदा मी इंदूरला गेलो असताना गुरुजींनी मला विचारलं, की अरे यार, मध्यंतरी मी कुमारजींची स्केचेस केली ती तू पाहिलीस की नाही? "नाही बुवा माझ्या पाहण्यात काही ती आलेली नाहीत" मी म्हणाले. "मग थांब तुला मी ती दाखवतोच," असे म्हणून गुरुजींनी त्यांच्या टेबलावर असलेल्या पुस्तकाच्या गठ्ठ्यामधून गुलाबी रंगाच्या हँडमेड पेपरचे कव्हर असलेले एक पुस्तक बाहेर काढले. भोपाळच्या 'भारत भवन' या कला आणि सांस्कृतिक केंद्रातर्फे प्रकाशित

होणारं ते एक नियतकालिक होतं. पूर्वग्रह किंवा पूर्वरंग असंच काहीसं त्याचं नाव होतं. हिंदीतले प्रसिद्ध कवी श्री. अशोक वाजपेयी हे भारत भवनच्या अशा उपक्रमांमागचे संचालक असायचे. भारत भवनशी संबंधित असलेल्या व्यक्ती आपापल्या कलेसंबंधी किंवा सांस्कृतिक विचार यात मांडत असत. या पुस्तकात गुरुजींनी कुमार गंधर्वांची केलेली स्केचेस छापलेली होती. गुरुजींनी ती मला दाखवली.

गुरुजींनी केलेली ती स्केचेस पाहिल्यावर मी थक्कच झालो. "फारच अप्रतिम. वा, क्या बात है गुरुजी" मी म्हणालो.

कमीत कमी रेषांमध्ये गुरुजींनी कुमारजी दर्शन घडवले होते. स्केचेस काळ्या शाईच्या पेनने केलेली होती. रेषांना इतकी अप्रतिम लय होती की "वा, क्या बात है' असे पाहणारा कोणीही म्हणेल. या लयबद्ध रेषा आकाराची सूचकता देऊन पुढे काढायच्या सोडून दिलेल्या होत्या.

कुमारजींच्या चेहऱ्यावर कुठेही नाक, कान, डोळे असा तपशील भरलेला नव्हता आणि तरीही कुमारजींच्या चेहऱ्याचे किंवा डोळे बंद केल्याचे एक्स्प्रेशन त्यात होते

गुरुजी मनापासून कुमारजींच्या गाण्यात किती तादात्म्य पावले आहेत, ते या स्केचेसमधून दिसत होते. कुमारजी गाताना मध्येच जसा पॉज घ्यायचे; पण त्या वेळी सुरावट किंवा गाणे कुठेही तुटलेले नसायचे, हीच त्यांची गुणवत्ता गुरुजींच्या स्केचेसमधूनदेखील सहजपणे आलेली होती. कुमारजींचे गाणे नेहमी ज्यांनी ऐकले आहे त्यांनी ही स्केचेस पाहिली, की त्यांच्या कानातही लगेचच कुमारजींचे सूर ऐकू येऊ लागतात आणि कुमारजींसमोर बसूनच आपण त्यांचे गाणेच ऐकत आहोत या अनुभवापर्यंत ही स्केचेस आपल्याला घेऊन जातात आणि चक्क गाणंच ऐकवतात. फारच समर्थपणे आणि तितक्याच सहजपणे केलेली ही स्केचेस आहेत.

"पण काय हो गुरुजी ही स्केचेस तुम्ही केव्हा केलीत? आणि कुठे केलीत?" मी विचारले.

"अरे यार, काय सांगू. तो पण एक मजेदार किस्साच आहे."

"कुमारजींना तबल्याची साथ करणारा वसंता आचरेकर तुला माहिती आहेच. त्याने एकदा त्याच्या गावाला म्हणजे कोकणात आचऱ्याला कुमारजींचे गाणे ठरवले. आम्हा सर्व मित्रमंडळींना तेथे निमंत्रण होते. इंदूरहून मी, राहुलजी बारपुते, चंदू नाफडे, सोलापूरचा राम पुजारी, पुण्याचे कुमारजींचे मित्र शरदचंद्र चिरमुले, पु. ल., प्रसिद्ध चित्रकार एम. आर. आचरेकर, याखेरीज कुमारजींचे काही शिष्य अशी बरीच मंडळी तिथं जमली होती. वसंता आचरेकरने त्यांच्या घरातला गुरं बांधायचा गोठा साफ करून शेणाने सारवून ठेवला होता आणि त्यावर सतरंज्या टाकून सर्वांसाठी बैठक तयार केली होती. आम्ही सर्व मित्रमंडळी त्यावर बैठक जमवून बसलो होतो. "पान जमवा यार गुरुजी !" राहुलजींनी मला सुचवलं. मी पान देईपर्यंत कुमारजींनी आपलं गाणं सुरू केलेलं होतं.



*कमीत कमी रेषांमध्ये गुरुजींनी कुमारजी दर्शन*

एम. आर. आचरेकर हे तर पेन्सिल ड्रॉईंग्ज आणि स्केचेसमधले दादा माणूस म्हणून प्रसिद्धच होते. त्यांनी वेळोवेळी आपली जागा बदलत त्याच स्केचिंगचं काम सुरू केले. मी, राहुलजी, चंदुभय्या व इतर ५-७ जणांचा आमचा ग्रुप कुमारजींचं गाणं ऐकण्यात मग्न झाला होता. एवढ्यात "गुरुजी ते एम. आर. आचरेकर बघा कशी स्केचेस करत आहेत, तुम्ही पण कराना स्केचेस," मला शेजाऱ्यांनी सुचवलं.

"खरं म्हणजे आचरेकरांसारखा मोठा सिनिअर माणूस तेथे असताना स्केचेस करायला माझी काही तबियत होत नव्हती आणि एवढ्या गर्दीत आपण आपले स्केचेस करत बसायचे यार, व इतर लोकांचे लक्ष

आपल्याकडे वेधून घ्यायचे हेही मला न जमणारं होतं आणि ते माझं नेचरही नाही," गुरुजी सांगत होते.

पण परत एक दोघांनी मला "गुरुजी तुम्हीपण स्केचेस करा ना आचरेकरांसारखी" असं माझ्यामागे सारखे टुमणेच लावले.

"माझ्याबरोबर पेन्सिल वगैरे काहीच सामान मी आणलेलं नव्हतं. खांद्यावरच्या पिशवीत पान -तंबाखूचा डबा व इतर काही वस्तू होत्या. मी पिशवीत हात घालून काही पाठकोरे कागद व पेन बाहेर काढले."

"पेन मी कागदावर टेकवले आणि एक बिंदू घेतला आणि कुमारजींची तान संपली, की तो एक बिंदू पकडायचो आणि मग डोळ्यासमोर कुमारजींची पोज असायचीच. या दोन बिंदूंमध्ये त्यांची पोज पकडायचो. बस्स ! अशा प्रकारे ही स्केचेस पोजेस तयार झाली आणि शिवाय कुमारजींच्या संगतीत आम्ही इतके वर्षे आहोत, की त्यामुळे कुमारजींचा चेहरा, हेड, कपाळ हे अगदी माझ्या डोक्यात फिट्ट बसलेले असल्याने ते स्केचेसच्या पोजेस करताना बरोबर यायचे" गुरुजी म्हणाले. कुणालाही लक्षात येणार नाही याप्रकारे माझे आपले काम चालले होते; पण कान मात्र कुमारजींच्या गाण्याकडेच होते. कुमारजींची दोन एक गाणी म्हणून झाली आणि पुढचे गाणे सुरू व्हायला अजून थोडा अवकाश होता. तंबोरे आणि लोकांची चूळबूळ चालू होती. एवढ्यात पी.एल.चे लक्ष माझ्याकडे गेलं. "काय हो गुरुजी? मगाचपासून २-४ वेळेस माझं लक्ष तुमच्याकडे गेलं पण तुमचं आपलं खाली मान घालून काही तरी चाललंय. काय चाललंय?" पी.एल.ने मला विचारले.

"काही नाही हो, उगाचच आपला काही तरी चाळा" मी म्हणालो. एवढ्यात माझ्याजवळ बसलेल्या कोणी तरी माझ्या स्केचेसचे कागद पी.एल.पर्यंत पोचवलेसुद्धा. "वा! क्या बात है गुरुजी! बहोत! तुम्ही तर कमालच केली यार! कुमारजींना अगदी बरोबर पकडलंय तुम्ही !" पी.एल. म्हणाले झालं! पी.एल. भोवती लगेच बघू बघू म्हणून गर्दी सुरू झाली.

"पण बरं कारे दिलीप, खरं सांगतो तुला यार, पी.एल.ने एकदा त्या स्केचेसला मान्यतेची पावती दिल्यानंतर मात्र माझा जीव भांड्यात पडला. बरं वाटलं." गुरुजी म्हणाले.



*चित्रकार एम.एफ. हुसेन गुरुजींच्या घरी गेले होते.*

कुमारजींची ही मी केलेली स्केचेस फारच लोकप्रिय झाल्याचे मला फार नंतर लक्षात आले.

गुरुजी मधून मधून पुण्याला तर यायचेच. गुरुजींनी कुमारजींची केलेली स्केचेस पाहून त्यांचे जे कोणी बरेच लोक फॅन्स झाले होते. त्यात पुण्यातील प्रथितयश डॉ. शशिकांत जोशी (डेन्टिस्ट) हे एक आहेत. कविता, गाणे, तत्त्वज्ञान, चित्रकला असे बरेच त्यांच्या आवडीचे व अभ्यासाचे विषय आहेत. गुरुजींना घेऊन मी त्यांच्या दवाखान्यात गेलो. गुरुजी आल्या आल्या डॉ. जोशींनी गुरुजींच्या पायाला हात लावला व वाकून नमस्कार केला. अनपेक्षितपणे झालेल्या या नमस्काराने गुरुजी एकदम भांबावून गेले. "अरे यार, काही गरज नाही अशा वाकून नमस्काराची मला फार अवघडल्यासारखं होतं तेव्हा ते राहू दे" गुरुजी म्हणाले. "अहो पण माझ्या पिढीने ज्यांच्या पायाला हात लावून नमस्कार करावा अशी किती माणसं आता शिल्लक राहिली आहेत? आणि त्यातच तुम्ही केलेली कुमारजींची स्केचेस पाहिल्यापासून मी तर चक्क तुमच्या प्रेमातच पडलो आहे." डॉ. जोशींनी नम्रतेने सांगितले. "अरे पण कुमारजींच्या त्या स्केचेसमध्ये माझा काय मोठेपणा आहे? जे त्यांच्याकडून आम्ही शिकलो किंवा घेतले तेच स्केचेसच्या निमित्ताने दाखवले. बस ! एवढंच !"

"खरं म्हणजे गंगेत उभे राहून गंगेतलंच पाणी घेऊन आपण गंगेलाच 'अर्घ्य' देत नाही का? तिचंच पाणी आपण तिलाच अर्पण करतो ना? मग? तसाच हा प्रकार आहे. माझं त्यात क्रेडिट घेण्यासारखं काहीही नाही. आम्हाला कुमारजींनीच जी दृष्टी दिली तीच आम्ही स्केचेसच्या रूपाने त्यांना (कुमारजींना) व्यक्त करून दाखविली." गुरुजी म्हणाले.

डॉ. प्रकाश साठे हे पुण्यात मानसोपचारतज्ज्ञ आहेत. त्यांना भेटायला गुरुजींना जायचे होते. डॉ. प्रकाश साठेंची समक्ष भेटून मी वेळ घेतली. "उद्या सकाळी ९.३० किंवा १० वाजेपर्यंत गुरुजींना घेऊन माझ्या घरी ये," डॉ. साठेंनी मला सांगितलं. दुसऱ्या दिवशी मी गुरुजींना रिक्षात घेऊन स्वारगेटला त्यांच्या सोसायटीपाशी थांबलो. पत्ता शोधण्यासाठी आम्ही माणूस शोधत होतो. इतक्यात समोरून डॉ. मोहन आगाशे आले. मला पाहिल्यावर "काय रे दिलप्या आज इकडे कुठे आलास?" त्यांनी विचारलं. गुरुजींकडे बोट दाखवून "हे इंदूरचे चित्रकार चिंचाळकर गुरुजी," मी ओळख करून दिली. मोहनने नेहमीचा चेष्टेचा मूड बाजूला सारून त्यांना नमस्कार केला. "अरे वा ! फार दिवस तुमच्याबद्दल मी ऐकून

आहे. तुम्हाला भेटायला मी फार उत्सुकही होतोच. भाई (पी.एल.) मध्यंतरी तुमच्याबद्दल सांगत होते," मोहन म्हणाला. मी आम्ही शोधत असलेल्या पत्त्याबद्दल त्याला सांगितलं आणि त्याच्या मार्गदर्शनाखालीच आम्ही डॉ. साठेंच्या घरी पोचलो. पोहे- चहापाणी गप्पा झाल्या. गप्पांमध्ये त्यांचे प्रामुख्याने कुमारजी व सोलापूरचे राम पुजारी हे विषय होते. डॉक्टरांकडून निघण्याची वेळ झाली. डॉ. साठेंनी त्यांच्या घरात गुरुजींनी कुमारजींच्या केलेल्या स्केचेसची एक फ्रेम भिंतीवर लावलेली दाखवली. "अरे वा ! तुमच्याकडे ही स्केचेस अजूनही ठेवलेली आहेत?" गुरुजी म्हणाले. डॉ. साठ्यांनी या चित्रांची एक उत्तम झेरॉक्स कॉपी गुरुजींना भेट म्हणून दिली. अनपेक्षितपणे मिळालेल्या या भेटीने गुरुजींना आनंद तर झालाच पण 'कमाल केली यार, तुम्ही डॉक्टर ! अहो, माझ्याकडे कुणी आलं तर त्यांना दाखवायलासुद्धा ही स्केचेस माझ्याकडे



*गुरुजींनी केलेले स्वतःचे स्केच*

नव्हती," गुरुजी म्हणाले.

नंतर एकदा डॉ. साठेंशी गप्पा मारताना मी त्यांना सांगितले, की तेव्हा तुम्ही गुरुजींना ती स्केचेस दिल्यामुळं गुरुजी फारच खूष झाले होते. डॉ. साठेंची प्रतिक्रिया त्यांच्याच शब्दांत सांगायची झाल्यास "अरे त्यात मी काय विशेष केलं? समुद्रानेच तयार केलेले मोती मी परत त्यालाच अर्पण केले. त्यात आपला कसला आलाय मोठेपणा."

गुरुजींच्या स्केचेसच्या संदर्भात कुमारजी मागे एकदा म्हणाले होते, की अरे यार, गुरुजींच्या स्केचेसमधील त्यांची रेषा पाहिली म्हणजे मला तर ती वझेबुवांचीच आठवण करून देते. (प्रसिद्ध गायक रामकृष्णबुवा वझे) वझेबुवांची तान म्हणजे जशी धारदार सुरीने कापड फाडत न्यावे ना, तशी असायची. गुरुजींच्या रेषेत देखील मला तेच सामर्थ्य जाणवते."

गुरुजींच्या स्केचेसमध्ये जसे मला कुमारजींच्या संगीतातील विचार व संस्कार यांचे नाते जुळलेले आढळते त्याचप्रमाणे कुमारजींच्या संगीत संकल्पनेतदेखील चित्रकलेसंबंधी विचार असायचा. कुमारजी म्हणायचे, की तंबोरा शांतपणे ऐकणे आवश्यक आहे. तंबोऱ्याने निर्माण केलेल्या कॅनव्हासवरच गाणारा रागचित्र काढत असतो. कुमारजींच्या देवासच्या घरी गुरुजी

व राहुलजी नेहमीच काहीना काही तरी निमित्ताने जात येत असत..

असेच एकदा हे दोघे देवासला गेले असताना गप्पागोष्टी करता करता या मंडळींची गाण्याची बैठक जमली. गाता गाता कुमारजींच्या गाण्यात नेहमीपेक्षा जरा वेगळ्या पद्धतीने आविष्कार सुरू झाला.

गाणे चालू असतानाच मध्येच कुमारजींनी गुरुजींना आणि राहुलजींना विचारले, "काय हो, समजतय ना? काय चाललंय ते? मी काय गातोय ते?"

गुरुजींनी आपलं चाचपडत अंदाज घेत सांगितलं. "हे तुम्ही बहुधा भूप म्हणत असावेसे वाटते; पण वेगळाच काही तरी वाटतोय. नेहमीसारखा वाटत नाही."

कुमारजी हसत हसत म्हणाले, "याला चैतीभूप म्हणतात. गुरुजी तुमच्या चित्रामध्ये जसे समोरून किंवा एका बाजूने (प्रोफाईलने) व्यक्तिचित्र (पोर्ट्रेट) काढण्याची पद्धत असते ना? तसाच प्रकार आहे हा !"

अहो, 'राग' म्हणजे ही जिवंत माणसेच आहेत. ती पुढून, समोरून दिसतात तशी बाजूने मागून दिसत नाहीत. वेगळी दिसतात. पण ती तीच असतात.

"एखाद्या रागाच्या स्वरूपाची ओळख आपल्याला समोरून पोर्ट्रेट बघणाऱ्यांसाठी असते. चैती भूप हे भूप रागाचे प्रोफाईल आहे."

कुमारजी अन गुरुजी जरी एकमेकांचे घनिष्ट मित्र असले तरीही कुमारजींना गुरुजी आपल्या कामाची प्रेरणा मानायचे. "अरे यार, कुमारजीकडून खरं म्हणजे खूप काही शिकण्यासारखं आहे. निसर्गातील बदलणारे ऋतुचक्र असो किंवा आदिवासींची लोकगीतं असोत यांचा आपला अभ्यास चालूच असायचा. लोकगीतं गात जाणाऱ्यांचे उच्चार पॉज त्यांच्याबरोबर लक्षात असायचे आणि मग त्यातूनच तर त्यांनी त्यांचे गीत हेमंत, गीत वर्षाण, मालवाकी लोकधनेसारखे कार्यक्रम तयार केला.

लोकगीतातल्या स्वरबिजांतून त्यांनी सहेली तोडी, मधू सूरजा, संजारी, मालवती, मधवा यासारख्या धून उगम रागांचे वृक्ष फुलवले, असे पु. ल.देखील सांगतात. हे कार्यक्रम सादर करताना त्यांचे स्वतःचे असे तर्कशास्त्र असायचे. गाण्यात निरनिराळ्या ठिकाणी ते करत असलेल्या उच्चारांचे किंवा टोनचे तर्कसंगत समर्थन त्यांच्याकडे तयार असायचे. कुमारजींच्या या सर्व चांगल्या गुणवत्ताच खरे म्हणजे मला शिकवत असतात आणि त्या प्रेरणांमधूनच मी माझे काम करत असतो." गुरुजी सांगत होते.

काय गंमत आहे बघा. म्हणजे इकडे गुरुजी कुमारजींना प्रेरणा मानायचे व त्यांच्याकडून मला बरंच काही शिकायला मिळाले, असे सांगायचे तर तिकडे कुमारजी म्हणायचे, "गुरुजी म्हणजे मोठा गझब का आदमी है यार."

"गुरुजींशी मैत्री होण्याअगोदरपासूनच झाड, पानं हे मी पण पाहत होतो की; पण निसर्गाकडे पाहण्याची दृष्टी मात्र मला गुरुजींमुळेच मिळाली."

"भीम बेटका, वेरुळ, अजंठा, दक्षिणेतील मंदिरे हे सर्व मी गुरुजींबरोबर पाहताना ही दृष्टी मला मिळाली.

वेरुळचे कैलास लेणे मी पाहायला गेलो आणि मी परत आलोच नाही. तिथंच राहिलो. एक लेणं पाहिलं चकित झालो. दुसरे पहिले सरेण्डर. तिसरे बघितले हरवून गेलो. चौथे पाहिले तर माझी शक्तीच गेली. डोळ्यात सारे भरले, पण मावेना.

त्याच्या अगोदर मला फक्त कान होता आणि त्यातून मी सूर समजत होतो; पण नंतर गुरुजींमुळे मला दृष्टीही मिळाली. पिंपळपान व अलिगढी कुलूप म्हणजे साक्षात गणेशाची रूपे आहेत, ही गोष्ट माझ्या लक्षात कधीही आलेलीच नव्हती आणि चहाची किटली म्हणजे तर प्रत्यक्ष मुकुटधारी गणेशच हेही दर्शन मला गुरुजींमुळेच होऊ शकले," असं कुमारजी सांगत असत.

कुमारजींच्या गाण्याचे कार्यक्रम महाराष्ट्रात तर नेहमीच होत असायचे. राहुलजी आणि गुरुजी हे दोघेही मित्र त्यांच्याबरोबर गाण्याच्या निमित्ताने महाराष्ट्रात यायला उत्सुकही असत. राहुलजी हे वृत्तपत्राचे संपादक असल्याने या नोकरीमुळे त्यांना कुमारजींबरोबर फिरायला जमेलच असे नसायचे; पण गुरुजी मात्र संधी मिळेल त्याप्रमाणे कुमारजींबरोबर महाराष्ट्रात येत असत.

एकदा कुमारजींच्या कोल्हापूरच्या आर्किटेक्ट चाहत्यांनी त्यांचा गाण्याचा कार्यक्रम ठरवला. कुमारजींबरोबर गुरुजीपण कोल्हापूरला आले होते. कोल्हापूरजवळील पन्हाळगडावरचा प्रोग्रॅम ठरला. आधी कुमारजींचे गाणे झाले. या दरम्यान कुमारजींनी 'गुरुजी' या आपल्या मित्राची ओळख सर्वांना करून दिली आणि त्यांच्या कला आविष्काराबद्दलही सांगितले. "आमच्या या गुरुजींची खासियत म्हणजे या गुरुजींना कशातही फॉर्म्स (म्हणजे विशिष्ट आकार) दिसत असतात."

कुमारजींनी एवढे सांगितले आणि मग लगेच जमलेल्या मित्रमंडळींनी गुरुजींच्या प्रात्यक्षिकासाठी कोऱ्या कागदांचा गठ्ठा, चारकोल, ड्रॉईंग बोर्ड, पीनस वगैरे सामान उपलब्ध करून दिले आणि मग गुरुजींची पन्हाळगडावर ही दुसरी मैफल सुरू झाली.

कोऱ्या कागदावर त्यांनी अ, आ, इ, ई अशी निरनिराळी अक्षरं मोठ्या आकारात काढली. तेथे जमलेल्या कोणालाही गुरुजींनी हे काय 'गौडबंगाल' चालवले आहे ते समजेना. गुरुजींनी सर्वांना ही अक्षरे उलटसुलट फिरवून दाखवली आणि विचारलं, की या अक्षरांमध्ये तुम्हाला काही चित्र दिसतंय का? पाहा बरं, कारण प्रत्येक अक्षर म्हणजे एक चित्रंच असतं. सर्व जण चिडीचूप झाले. अन मग गुरुजींनी 'अ'मधील पिंपळाचे पान किंवा गणपती स्वरूप दाखवले तर कधी 'अ'मध्येच भजन करीत बसलेला माणूस दाखवला. 'म'मध्ये मांजराच्या आकाराचं अंगीभूत आहे हे गुरुजींनी दाखवेपर्यंत कोणाच्या लक्षातही आले नाही.

आणि मग याच प्रकारे गुरुजींनी देवनागरीतील इतर अक्षरांमधली चित्रे दाखवली. देवनागरी अक्षरांनंतर इंग्रजी अक्षरांची फरमाईश सुरू झाली. इंग्रजी ए अक्षरातील उंट गुरुजींनी दाखवल्यावर कुमारजींचे हे मित्रमंडळ थक्कच झाले.

कुमारजींनी जसे संगीतातल्या सारेगम या मूलभूत स्वरांमधूनच रागांची नव्या पद्धतीने मांडणी करून नवीन शैलीचे संगीत तयार केले तसेच गुरुजींनी अ, आ, ई या मूलभूत देवनागरी लिपीच्या अक्षरांमधून चित्रनिर्मिती करून दाखवली. दोघेही एकमेकांचे गुण हेरून आपापल्या कला माध्यमातून

आपापला कला आविष्कार देत राहिले. हे दोघेही एकमेकांना आपल्या कलेचे प्रेरणा मानायचे.

गुरुजींचा अक्षरांचा खेळ संपल्यावर त्यांनी झाडांच्या फांद्या, पाने जमवून त्यात आहे त्या परिस्थितीतच त्यातील 'जिराफ' किंवा ऐटीत चाललेला 'वाघ'ही दाखवला.

अत्यंत अचानकपणे समोर आलेली ही मैफल गुरुजींनी हसत खेळत जिंकली होती आणि श्री. गोखले, श्री. बेरी, (कै.) शिंदे (प्राचार्य, स्कूल ऑफ आर्किटेक्चर) सारखे आर्किटेक्ट्स व तात्या खानोलकर (निवृत्त कार्यकारी अभियंता, सा. बां. खाते) अशी कोल्हापुरातील कलावंत व रसिक मित्रमंडळी जमवली. मग ही मंडळी कधी इंदूरला गुरुजींच्या घरी जाऊन किंवा गुरुजी पुण्यात आले आहेत असे समजल्यावर थेट पुण्यात येऊन प्रेमाने भेटत राहिली.

## आनंदवनात...

गुरुजी कुमार गंधर्वांना जसे आपल्या कलेची प्रेरणा मानायचे तसेच ते 'बाबा आमटे' यांनाही आपले कलेचे प्रेरणास्थान मानायचे.

गुरुजी म्हणायचे, "यार, माझे कलासाहित्य तर निर्जीवच असते. त्यांना मी देईल तो आकार ते बिचारे घेते. त्यांना जीव नसल्याने, वेदना नसल्याने ते काहीही तक्रारही करत नाही आणि त्यामुळे माझे काम तर फारच सोपे होते. अशा साहित्यातून मी काही तरी उपद्व्याप करत असतो आणि तुम्ही लोक मला कलावंत म्हणत असता."

बाबा आमटेंच्या आनंदवनात मित्रमेळाव्याच्या निमित्ताने मी आणि राहुलजी गेलो होतो. बाबांशी ओळख झाली, त्यांचे आनंदवनातले महारोग्यांसाठी त्यांनी केलेले काम पाहिले अन मी प्रभावित झालो यार.

ज्यांची नाके झिजलेली आहेत, हातापायांची बोटं सडलेली आहेत. चेहऱ्याने विद्रूप झालेल्या आणि मनाने खचलेल्या महारोग्यांना ज्यांनी औषध उपचार केले त्यांना योग्य आहे ते उद्योगधंदे शिकवून स्वतःच्या पायावर उभे राहायला मदत केली. ही माणसे म्हणजेच आपली कलासाधना आणि साहित्य आहेत, असे ज्यांनी मानले तो बाबा आमटे हाच खरा माझ्या दृष्टीने कलावंत आहे.

"खरं सांगू? बाबांची ओळख झाली त्यांचं काम बघितलं अन माझं मन अंतर्मुख झालं. माझ्या मनात तेव्हा उरलासुरला देखील जो अहंकार असेल तोही पण गळून पडला." गुरुजी सांगत होते.

आनंदवनाच्या मित्रमेळाव्यात मग गुरुजी नेहमी यायला लागले. गुरुजींचे व्यक्तिमत्त्व, त्यांची मृदुभाषा ही सगळ्या आनंदवनातील लोकांशी जवळीक साधू लागली. आजूबाजूच्या परिसरातील दगडधोंडे, पाने, फांद्या, झाडांच्या सावल्या याच्यातदेखील कसे चित्र किंवा शिल्प दडलेले आहे, हे जसे गुरुजींनी दाखवायला सुरवात केली तशी आनंदवनातल्या व आजूबाजूच्या

सर्वसामान्य माणसांनादेखील आत्मविश्वास आला. तेही आपल्याला सापडणारे दगड किंवा पाने, फांद्या घेऊन येऊन गुरुजींना त्यात दिसणारे चित्र किंवा शिल्प दाखवू लागले आणि गुरुजीदेखील प्रत्येकाचे कौतुक करून त्यांना प्रोत्साहन देत राहिले.

बाबा आमटेंचा मोठा मुलगा डॉ. विकास आमटे हादेखील आपली नेहमीची कामे थोडी बाजूला ठेवून गुरुजींबरोबर गप्पा मारत आनंदवनात फिरत राहिला आणि त्यांनीही चिंचाळकर गुरुजींना आपल्या गुरुस्थानी स्थान दिले.

डॉ. प्रकाश आमटे हा डॉ. विकासचा लहान भाऊ. तो माडिया, मुरीया आदिवासींसाठी गडचिरोली जिल्ह्यात भामरागड येथे काम करतो. संस्थेच्या कामासाठी डॉ. विकास आमटेचे भामरागड, सोमनाथ जंगल यासारख्या ठिकाणी जाणे येणे होतच असते. अशा या जंगलातून लहान मोठे विशिष्ट आकारांचे दगड, मोठ्या झाडांचे कापलेले बुंधे, बांबूच्या झाडाच्या मळ्या यासारखे बरेच साहित्य एकत्र करून या वस्तूंचेच 'नैसर्गिक चित्र व शिल्पांचे' एक कायमस्वरूपी प्रदर्शन गुरुजींच्या प्रेरणेने डॉ. विकास आमटेने आनंदवनात उभे केले आहे.

मित्रमंडळाच्या निमित्ताने बाबा आमटे यांचे भारतभरातले आणि विविध क्षेत्रांत काम करणारे मान्यवर नामांकित आनंदवनात जमत असत. एका मित्रमेळाव्यात पुण्याहून पु. ल., सुनीताबाई, मुकुंदराव व शांताबाई किर्लोस्कर, भास्कर चंदावरकर, वसंतराव देशपांडे, डॉ. संचेती आणि डॉ. रागिणी भिंगारे, निर्मलाताई व माधुरी पुरंदरे आल्या होत्या. नागपूरहून राम शेवाळकर, रूपा कुलकर्णी, पत्रकार सुरेश द्वादशीवार, चंद्रपूरहून लोकसत्तेचे व्यंगचित्रकार मनोहर सप्रे आलेले होते. इंदूरहून गुरुजी, राहुलजी, बाबा डिके, कुमार गंधर्व व त्यांचे मित्र पद्मकुमार मंत्री, लंडनचा गुरुजींचा शिष्य चित्रकार वसंत चिंचवडकर, वसंत पोतदार व इतर काही जण आले होते. मुंबईहून आर्किटेक्ट शशी मेहता व त्यांचे मित्र; तसेच 'आविष्कार' या नाट्यसंस्थेचे अरविंद-सुलभा देशपांडे, श्री. व सौ. साखरदांडे यांच्या 'दुर्गा झाली गौरी'च्या कलावंतांचा संच घेऊन आले होते. मित्रमेळाव्यातील एका रात्री त्यांचा नाट्यप्रयोगही झाला.

आनंदवनात सर्वांच्या राहण्याची व्यवस्था अगदी चोख होती. दुपारचे जेवण झाल्यावर शेवाळकर, गुरुजी, राहुलजी यांचा कुणाच्या तरी खोलीवर गप्पांचा अड्डा सुरू व्हायचा. माझ्यासारख्या ज्युनिअर माणसाला निरनिराळ्या व्यक्तिमत्त्वांचे किस्से ऐकण्यासाठी ती एक मोठी पर्वणीच असायची आणि त्या वयात माझ्यावर होणारा तो एक संस्कारही होता.

पाहुणे मंडळी राहत असलेल्या दोन इमारतींच्या मधल्या मोकळ्या जागेत आकाराने लहान पण रंगीत आणि फक्त एकच माणूस राहू शकेल, असा एक तंबू सर्वांचे लक्ष वेधून घेत होता. त्यात एक जीन पँट आणि टी शर्ट घालणारा कानात डूल घातलेला, केस वाढवलेला, अंगाने सडपातळ असा तरुण पाहत होता.

दोन दिवसांच्या मित्रमेळाव्यात स्थानिक माणसांचा आखाडा व पाहुणे मंडळींची नाटक, गाणी वगैरे कार्यक्रम झाले.

मित्र मेळावा संपला. सर्व मंडळी आता परतीच्या मार्गावर निघाली. या सर्व जाण्यामान्या माणसांना रेल्वे स्टेशनवर सोडण्यासाठी आनंदवनातून बसची व्यवस्था केलेली होती. गुरुजींसकट सर्व जण बसमध्ये जाऊन बसले. तंबूमध्ये राहणारा तो तरुण मुलगाही लगबगीने आपले सामान घेऊन बसमध्ये चढला.

स्वतः बाबा साधनाताई, डॉ. विकास, प्रकाश व त्यांचे कुटुंबीय, चित्रकार जयंत पाटील, आनंदवनातील कार्यकर्ते व माझ्यासारखे इतर काही जण पाहुण्यांना निरोप देण्यासाठी बसपाशी उभे होते.

तंबूत राहणारा मुलगा बसमध्ये चढताना पाहिल्यावर बाबांनी विचारलं, 'अरे, हा कोण मुलगा आहे?' बसमध्ये बसलेल्या गुरुजींनी ते ऐकलं. गुरुजी पटकन बसमधून खाली उतरले अन बाबांना म्हणाले, 'बाबा, हा माझा मुलगा दिलीप. ऑस्ट्रेलियामध्ये शिकायला होता.' बाबा म्हणाले, 'गुरुजी, अहो कमालच केली तुम्ही. अहो या दोन दिवसांत त्याची अन माझी साधी ओळख तरी करून द्यायची की नाही?'

गुरुजी म्हणाले, 'बाबा, मला जरा भीतीच वाटत होती, की लोक काय म्हणतील, की बघा, मुलगा कसा छान छान व्यवस्थित राहतोय. अन त्याचा बाप बघा कसा राहतोय? आणि म्हणून मग मी त्याची ओळख करून नाही दिली.'

गुरुजींच्या या मिस्कील उत्तराने सर्व जण मनसोक्त हसले.

गुरुजींनी तेव्हा साधा खादीचा पोशाख केलेला होता. बाबा आमटे मेधा पाटकरच्या नर्मदा बचाओ आंदोलनाच्या निमित्ताने आनंदवन सोडून मध्य प्रदेशमध्ये कसरावत येथे गेले आणि मग आनंदवनात दर वर्षी भरणारा हा मित्रमेळावा बंद पडला.

## मुंबईतले प्रदर्शन

प्रसिद्ध नाटककार विजय तेंडुलकर यांना मध्य प्रदेश सरकारतर्फे दिला जाणारा 'कालिदास सन्मान' वर्तमानपत्रांतून घोषित झाला होता. त्या वेळी मी इंदूरला गुरुजींच्या घरीच होतो. गुरुजी मला म्हणाले, ''बरं का रे यार, परवा सकाळी लवकर उठून आपल्याला भोपाळला तेंडुलकरांच्या कालिदास सन्मान समारंभास जायचे आहे.''

ठरल्याप्रमाणे सकाळी लवकर उठून मी गुरुजींबरोबर बसने भोपाळला गेलो. तेंडुलकरांची राहण्याची व्यवस्था जेथे केली होती तिथं जाऊन आम्ही त्यांना भेटलो. अत्यंत अनपेक्षितपणे मी व गुरुजी त्या ठिकाणी भेटल्याने तेंडुलकरांनाही आनंद झाला. त्यांचं अभिनंदन आम्ही केलं. तेंडुलकरांबरोबरच कालिदास सन्मान समारंभाच्या ठिकाणी गेलो. समारंभ संपल्यावर तेंडुलकरांबरोबर गप्पाही रंगल्या.

तेंडुलकर त्या वेळी मुंबईच्या अलियावरजंग या वांद्र्याच्या संस्थेच्या एका प्रोजेक्टचं काम करीत होते. गुरुजींना अन मला त्यांनी या प्रोजेक्टमध्ये त्यांच्याबरोबर काम करण्याची ऑफर दिली. गुरुजींनी व मी लगेचच तेंडुलकरांना मान्यताही दिली; पण पुढे अलियावरजंग संस्थेच्या कामाच्या पद्धतीचे सरकारीकरण झाल्याने तेंडुलकरांनी हा प्रोजेक्ट सोडून दिला; पण या सगळ्या प्रकारात गुरुजींबरोबर व तेंडुलकरांबरोबर काम करण्याची माझी संधी हुकल्याने मला मात्र वाईट वाटत राहिले. मनाला रुखरुख राहिली.

चिंचाळकर गुरुजींच्या कलाकृतीचे एक प्रदर्शन मुंबईच्या जहांगीर आर्ट गॅलरीत १९७७ मध्ये झाले. मुंबई गॅलरीचे बुकिंग गुरुजींवर प्रेम करणारा वसंत पोतदार याने अगोदरच करून ठेवले होते. अगोदरच्या रविवारी चिंचाळकर गुरुजी व त्यांच्या कलाकृती या विषयावर या वसंतानेच 'महाराष्ट्र टाईम्स'मध्ये एक अप्रतिम लेख छापून आणण्याची व्यवस्था अगोदरच केलेली होती. हा लेख तेव्हा खूपच गाजलाही होता.

या लेखामुळे गुरुजींच्या प्रदर्शनाबद्दल मुंबईच्या मराठी माणसाच्या मनात खूपच उत्सुकता निर्माण केली होती आणि स्वतः वसंत पोतदार मात्र तेव्हा कोलकत्त्याला त्याच्या काही तरी कामानिमित्त निघून गेला होता.

या प्रदर्शनाच्या निमित्ताने गुरुजी, राहुलजी आणि इंदूरचे त्यांचे मित्र . वणकर हे तिघे गुरुनाथ भट यांच्या घरी उतरले होते. गुरुनाथ भट हे तेव्हा टाटा एक्सपोर्टमध्ये नोकरीला होते. मुंबईत वरळीला 'समुद्र महाल' या उंच इमारतीत त्यांचा आलिशान फ्लॅट होता.

या प्रदर्शनासाठी गुरुजींनी मला मुंबईला बोलावून घेतले होते. मी मुंबईत पोचल्यावर गुरुभटांच्या घरी गुरुजींना फोन केला. गुरुजींनी मला रात्री ९ च्या सुमारास जहांगीर आर्ट गॅलरीत ये असें सांगितले.

त्या रात्री अरुण केळकर नावाच्या माझ्या मित्राला घेऊन मी आर्ट गॅलरीत गेलो. या काळात अरुण केळकर हा चार्टर्ड अकाउंटंटची परीक्षा देत होता. तसेच नाट्य क्षेत्रातील प्रसिद्ध कला दिग्दर्शक आणि इंटिरियर डेकोरेटर रघुवीर तळाशिलकर यांच्याबरोबरही तो काम करत होता. निरनिराळ्या कलाकारांबरोबर रात्र रात्र जागून पडेल ते काम करण्याचा त्याचा अनुभव होता आणि ती त्याला हौसही होती.

राहुलजी, गुरुजी, वणकर यांच्यात बरोबर गुरुभटांचा मुलगा 'यतिन' हाही प्रदर्शन लावण्याच्या कामाच्या मदतीसाठी म्हणून आर्ट गॅलरीत आलेला होता.

चित्रांच्या फ्रेमा ठोकणे, गुरुजींच्या आर्ट पिसेसना प्रॉपर पोझिशनमध्ये आणणे, तसेच उभ्या आडव्या फ्रेम्सना चित्राचा आशय विचारात घेऊन आर्ट गॅलरीत लावताना त्याची क्रमवारी ठरवणे या स्वरूपाची कामे तेव्हा माझ्याकडे होती.

याखेरीज माझ्याकडे आर्ट गॅलरीत निरनिराळ्या ठिकाणी लावण्यासाठी ३-४ पोस्टर्स तयार करण्याची व ही पोस्टर्स प्रदर्शनाच्या हॉलच्या बाहेर आणि आर्ट गॅलरीतील रेस्टॉरंटमध्ये लावण्याची जबाबदारी पण सोपवली होती.

रात्रभर हसत खिदळत, गप्पा मारत ही सर्व कामे चालू होती. यतीन भटने घरून येताना दोन मोठे थर्मास भरून चहा आणलेला होता. चहा बरोबर खाण्यासाठी बिस्किटे, चिवडा, चकल्या पण त्याच्या आईने धाडल्या होत्या. मधून मधून श्री. वणकर त्याचे वाटप करत होते. राहुलजी गुरुजीचे नई दुनियामधले किंवा नाट्यभारतीमधले किस्से सांगत होते. रात्री तीन साडेतीनपर्यंत सर्व प्रदर्शन व पोस्टर्स जागेवर लावून आम्ही आपापल्या मुक्कामाच्या ठिकाणी परतलो.



*नारळाच्या करवंट्यांपासून साकारलेल्या कलाकृती*

दुसऱ्या दिवशी सकाळी मी व अरुण केळकर ९॥ वाजताच जहांगीर आर्ट गॅलरीत आलो. काल रात्री काम करणारी सर्वच टीम परत जमली. प्रदर्शनाच्या उद्घाटनासाठी गुरुजींचे मित्र व प्रसिद्ध गायक पं. कुमार गंधर्व हे सकाळी ११ वाजता आले. त्यांच्या हस्ते प्रदर्शनाचे औपचारिक उद्घाटन झाले.

प्रदर्शन बघायला येणाऱ्या प्रेक्षकांमध्ये उद्योगपती, पत्रकार, शास्त्रज्ञ, कलासमीक्षक, जे. जे. स्कूल ऑफ आर्टमधील विद्यार्थी आणि सर्वसामान्य नागरिकही होते.

प्रदर्शनाच्या वेळी नेहमी या आर्ट गॅलरीत असणारी चमक धमक, रंगांची उधळण, अमूर्त फॉर्मस यापैकी काहीच नव्हतं. होता तो फक्त सरळसोट साधेपणा; पण त्यामुळेच या प्रदर्शनाला स्वतःचे असे एक वेगळे अस्तित्व आलेले होते.

आर्ट स्कूलमध्ये विद्यार्थी किंवा सर्वसामान्य माणसे गुरुजींचे काम पाहून स्तंभित झाली होती. ज्यांना या कामाबद्दल किंवा कलाकारांबद्दल जिज्ञासा होती ते स्वतःहून गुरुजींची ओळख करून घेत होते. गुरुजी पण त्यांच्या शैलीत लोकांच्या प्रश्नांना उत्तरे देत होते आणि त्यांच्याशी संवाद साधत होते. या सर्व व्यवहारात अनौपचारिकपणा होता.

या प्रदर्शनामध्ये गुरुजींनी तुटलेल्या हवाई चपलेची केलेली 'मोनालिसा' होती. लाकडी खुर्चीच्या पाठीचे बनवलेले 'रामकृष्ण परमहंस' होते. वाळलेल्या रंगीत पानांचे एकमेकांवर चिकटवून कोलाज पद्धतीने केलेले लँडस्केप होते. त्याच प्रकारे खेड्यातील बाजाराला आलेला बायकांचा ग्रुप होता. गुरुजींनी स्वतःच्या फाटक्या बनियनपासून बनवलेला 'येशू ख्रिस्त' होता आणि तोही पूर्वी रेडिओच्या एरियलसाठी लाकडी क्रॉस वापरत त्यावर ठोकलेला होता.

गुरुजींच्या या प्रदर्शनाला भेट देणारे जे मान्यवर होते त्यात गुरुजींचे जुने मित्र भाई (पी.एल.) हेही होते. त्यांनी या प्रदर्शनातून गुरुजींनी प्लायवूडचे पापुद्रे काढून तयार केलेलं एक लँडस्केप विकत घेतलं.

प्रदर्शन लावतेवेळी मदतीला असलेला